पदनिर्मीती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन याबाबतचे निर्बंध व आनुषंगिक आढावे आणि अतिरिक्त संवर्ग योजनांतर्गत कक्षाची स्थापना व त्याचे व्यवस्थापन....

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय, क्रमांक : असंक-१००१/प्र.क्र.२९ (भाग-२)/२००२/वित्तीय सुधारणा,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ फेब्रुवारी, २००२

**वाचा :** शासन निर्णय, क्रमांक : असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०सप्टेंबर, २००१.

## प्रस्तावना

राज्य शासनाच्या महसूली जमेच्या तुलनेत आस्थापनेवरील खर्च वाढला असल्यामुळे राज्याच्या विकासाच्या / जनकल्याणाच्या योजना राबविण्यासाठी पुरेसा निधी उपलब्ध होऊ शकत नाही. याबाबत उपाय योजना म्हणून शासनाच्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांच्या मासिक वेतन भत्त्यावरील प्रशासकीय स्वरुपाचा खर्च कमी करण्याच्या उद्देशाने तसेच शासकीय विभागांकडील विविध स्वरुपाच्या योजना आणि कार्यक्रम यांचे पुनरिक्षण करुन त्या योजना आणि कार्यक्रमांसाठी मंजूर करण्यात आलेल्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांच्या पदांचा आढावा घेऊन अनावश्यक अथवा जादा ठरत असणाऱ्या कर्मचारी आणि अधिकाऱ्यांना अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यासंबंधी शासनाने निर्गमित केलेल्या उपरोक्त दि.१० सप्टेंबर, २००१ च्या शासन निर्णयाच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीमध्ये निदर्शनास आलेल्या प्रशासकीय आणि तांत्रिक स्वरुपाच्या अडचणी निवारण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तदनुसार शासनाने सदर शासन निर्णयात खाली दर्शविल्याप्रमाणे सुधारणा करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

## शासन निर्णय

१. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या उपपरिच्छेद १.२.२ ऐवजी खालील सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावा.

**सुधारित उपपरिच्छेद :-**

१.२.२ योजना व कार्यक्रमांच्या आढाव्यामधून प्रामुख्याने वेतन व भत्त्याच्या चालू वर्षीच्या खर्चाच्या तुलनेने पुढील वर्षी १.५ टक्के बचत होईल अशी अपेक्षा असून ही बाब मध्यवर्ती धरुन आढावा घेतला जावा. **विभागात अतिरिक्त ठरलेल्या पदांपैकी रिक्त पदे अतिरिक्त ठरल्यामुळे होणारी काल्पनिक बचत गृहित धरण्यात येऊ नये.**

२. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या उपपरिच्छेद १.२.३ ऐवजी खालील सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावा.

सुधारित उपपरिच्छेद :-

१.२.३ प्रशासनिक विभागांनी त्यांचा व त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख कार्यालयातील पदांचा आढावा घेऊन तो परिच्छेद १.१ मध्ये नमूद केलेल्या संयुक्त समितीकडून संमत करुन घ्यावा. तथापि अशाप्रकारे पदांच्या आढाव्याला संयुक्त समितीची संमती प्राप्त करताना काही तांत्रिक / प्रशासकीय स्वरुपाचा वाद निर्माण झाल्यास अशा प्रकरणांमध्ये सदर प्रस्ताव अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (सेवा) (सा.प्र.वि.) यांना निर्णयासाठी सादर करण्यात यावा व त्यांच्या निर्णयानंतर विभागाच्या प्रभारी मंत्र्यांची मान्यता घेऊन सदर आढावा अंतिम निर्णयासाठी उच्चस्तरीय सचिव समितीसमोर वित्त विभागामार्फत सादर करावा.

३. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या उपपरिच्छेद १.३ (अ) ऐवजी खालील सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावा.

सुधारित उपपरिच्छेद :-

१.३ (अ) प्रशासनिक विभागांनी आढाव्यांती २००१-०२च्या वेतनावरील खर्च (अर्थसंकल्पित तरतूद + पुरवणी मागण्या - सुधारित वेतनश्रेणीच्या थकबाकीची रक्कम, असल्यास) याच्या तुलनेने सन २००२-०३ च्या अर्थसंकल्पीय अंदाजातील वेतनावरील खर्चात ९.५ टक्के बचत दर्शविल्यास सदर बचतीसह सादर केलेला आढावा पुढील परिच्छेद-२.५ अन्वये स्थापित केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीसमोर केवळ सहमतीसाठी ठेवण्यात येईल.

४. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या उपपरिच्छेद १.३ (ब) ऐवजी खालील सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावा.

सुधारित उपपरिच्छेद :-

१.३ (ब) या आढाव्यास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता प्राप्त झाल्यानंतर संबंधित प्रशासकीय विभागांनी आढाव्यानुसार मान्य करण्यात आलेल्या संवर्गनिहाय आकृतिबंधाबाबतचे औपचारिक आदेश प्रथम निर्गमित करावे व त्याची प्रत संचालक, लेखा व कोषागारे यांना पाठवावी. या कार्यवाहीनंतर सन २००२-०३ या संपूर्ण वर्षभरात पदस्थापना, पदोन्नत्या जिथे आवश्यक तेथे कर्मचाऱ्यांचे मुख्यालय बदलून सेवा वापरण्याबाबत प्रशासनिक विभागांना पूर्ण स्वातंत्र्य राहील.

५. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या उपपरिच्छेद ३.१ ऐवजी खालील सुधारित उपपरिच्छेद समाविष्ट करण्यात यावा.

सुधारित उपपरिच्छेद :-

४.१ कोणत्याही कारणामुळे सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त असलेली पदे (स्थायी व अस्थायी) व्यपगत होतील. जी पदे रिक्त झालेली आहेत व ज्यांचा अतिरिक्त कार्यभार इतर अधिकारी/कर्मचाऱ्यांस दिला आहे ती पदे रिक्त झाल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यात नियमित स्वरुपात न भरल्यास व्यपगत झाली असे समजण्यात यावे. अशी पदे पुनरुज्जीवित करणे आवश्यक असल्यास प्रशासकीय विभागांनी सदर पदे कोणत्या दिनांकापासून रिक्त आहेत, त्या पदास शेवटची मुदतवाढ कोणत्या आदेशान्वये किती कालावधीपर्यंत दिली आहे, तसेच त्या पदांची आवश्यकता का आहे याबाबत योग्य ते समर्थन देऊन प्रस्ताव वित्त विभागाकडे अभिप्रायांसाठी पाठवावा. तदनुसार वित्त विभागाने सहमती दिली तरच प्रस्तावास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घ्यावी.

४. शासन निर्णय, क्रमांक- असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१० सप्टेंबर, २००१ च्या परिच्छेद ४ मध्ये खालील उपपरिच्छेद नव्याने समाविष्ट करण्यात यावेत.

**नव्याने समाविष्ट करावयाचे उपपरिच्छेद**

उपपरिच्छेद क्रमांक ४.९

४.९ ज्या प्रकरणी उच्चस्तरीय सचिव समितीने पदे भरण्यास मान्यता देतांना ही पदे अतिरिक्त संवर्ग कक्षातील कर्मचाऱ्यांमधून भरण्यात यावीत अशी अट घातली असेल त्या प्रकरणी विभागांनी कर्मचारी आवश्यकतेबाबत विहित मागणीपत्र प्रथम केंद्रीय अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे (केंद्रीय अतिरिक्त संवर्ग कक्ष, रुम नं.३५७, तिसरा मजला, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२. दूरध्वनी क्र. २८२ १३ ६८) सादर करावे. केंद्रीय अतिरिक्त संवर्ग कक्षाकडून ज्या पदांसाठी कर्मचारी उपलब्ध होऊ शकले नाहीत अशाच पदांवर विभागाद्वारे विहित मार्गाने पदभरती करण्यात यावी.

उपपरिच्छेद क्रमांक ४.१०

४.१० तांत्रिक कारणांसाठी विशिष्ट कालावधीकरीता निर्माण करावयाच्या अधिसंख्य पदांच्या निर्मितीसाठीसुध्दा उच्चस्तर सचिव समितीची मान्यता घेणे बंधनकारक राहील. अधिसंख्य पदनिर्मिती न करता नियुक्ती दिल्यास वेतनासंबंधी काही अडचणी उद्भवल्यास त्यास संबंधित विभाग जबाबदार राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

विनोद कुळकर्णी
शासनाचे उप सचिव

प्रति
* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
१०. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१४. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
* १५. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
* १७. प्रबंधक महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई.
* १८. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
* १९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* २०. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई.
* २१. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर / मुंबई, वांद्रे, मुंबई - ४०० ०५१
२२. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
२३. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई / पुणे/ नागपूर / औरंगाबाद / नाशिक / अमरावती
२४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२५. सर्व उप कोषागार अधिकारी
२६. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग (कार्यासन - हाऊसिंग सेल, १९-सी), मंत्रालय, मुंबई - ३२.
२८. सर्व विभागीय आयुक्त.
२९. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३२. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३३. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३४. संचालक, (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१.
३५. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३६. निवड नस्ती, वित्तीय सुधारणा, वित्त विभाग

* पत्राद्वारे.

---